**खोरे समरुपण विभाग, पुणे या विभागाच्या तांत्रिक बाबींच्या नियंत्रणात बदल करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- आढावा-२०१९/प्र.क्र. ६६/२०१९/आस्था.(पुनर्रचना)**
मादाम कामा मार्ग हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २९ एप्रिल, २०२५.

**वाचा:-** १) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक :टिआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि.८/३/१९८४

२) पाटबंधारे विभाग, शासन निर्णय, क्रमांक :आढावा १००२/(३३५/०२)/आ(प्रशि), दि.०६.०२.२००३

३) जलसंपदा विभाग, शा. नि., क्र. जविप्र-२००७/(२९३/०७)/जसंनि, दि. १२.१२.२००७

४) जलसंपदा विभाग, शा.नि.,क्र. आढावा-२०१९/प्र.क्र.६६/२०१९/आ.(पुन.), दि. ०७.०९.२०१९.

५) नोडल अधिकारी, राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्प तथा मुख्य अभियंता, जलविज्ञान व धरण सुरक्षितता, नाशिक यांचे पत्र क्र. एसपीएमयु/तांशा-३/२७७/२०२४, दि. २७.०६.२०२४.

**<u>प्रस्तावना :-</u>**

सन २००५ व २००६ या वर्षी राज्यात उद्भवलेल्या पूर परिस्थितीमुळे आपत्कालीन परिस्थितीत धरणातून सोडावयाच्या विसर्गाचे अचूक निदान व पूराचे नियोजन करण्याबाबत मार्गदर्शक तत्वे विहीत करण्यासाठी मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक अधिनस्त अधीक्षक अभियंता, आधार सामग्री पृथ:करण मंडळ, नाशिक अंतर्गत खोरे समरुपण विभाग, पुणे येथे कार्यान्वित करण्यात आला आहे. कृष्णा व भिमा खोऱ्यांमध्ये उभारण्यात आलेल्या आधार सामग्री संकलन प्रणाली (Real Time Data Acquisition system-RTDAS) व एककालिक नदी प्रवाह व धरण प्रचालन प्रणाली (Real Time System Flow & Reservoir Operation System-RTSF & ROS) अंतर्गत Real Time Data नुसार प्रत्यक्ष व अंदाजीत पर्जन्यमान, येवा, विसर्ग, पूर इ. बाबत तुलनात्मक अभ्यास करून कृष्णा व भीमा खोऱ्यातील पूर परिस्थिती नियंत्रणात ठेवण्यासाठी खोरे समरुपण विभाग, पुणे उपयुक्त ठरत आहे.

२. सदर विभागाचे राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्प (NHP) अंतर्गत करावयाच्या कामांबाबत तांत्रिक बाबींचे नियंत्रण मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक यांच्याकडे व वार्षिक

पूरनियंत्रण व प्रशासकीय बाबींचे नियंत्रण मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे यांच्याकडे संदर्भाधिन क्र.४ च्या शासन निर्णयान्वये सोपविण्यात आले आहे.

३. सद्य:स्थितीत जलविज्ञान प्रकल्पांतर्गत राबविण्यात येत असलेल्या राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्पांतर्गतच्या उपलब्ध निधीतून संगणकीय यंत्रणा Upgrade करुन कार्यान्वित करण्यात आली असून राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्प मार्च २०२५ रोजी संपुष्टात आला आहे. खोरे समरुपण विभागाच्या प्रणालीची थेट उपयोगिता प्रामुख्याने महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास असून सदर कार्यालय प्रादेशिक कार्यालयातच स्थित असल्याने त्रुटींची पूर्तता करण्याच्या दृष्टीने व तत्सम अंमलबजावणी तत्परतेने करण्यासाठी या विभागाच्या तांत्रिक नियंत्रणात बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत, शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय -:</u>**

कृष्णा व भिमा खोऱ्यांमध्ये उभारण्यात आलेल्या आधार सामग्री संकलन प्रणाली (Real Time Data Acquisition system-RTDAS) व एककालिक नदी प्रवाह व धरण प्रचालन प्रणाली (Real Time System Flow & Reservoir Operation System-RTSF & ROS) मॉडेलचा कार्यक्षम वापर होण्यासाठी आधार सामग्री पृथ:करण मंडळ, नाशिक अंतर्गत कार्यान्वित करण्यात आलेल्या खोरे समरुपण विभाग, पुणे या विभागीय कार्यालयाचे वार्षिक पूरनियंत्रण व प्रशासकीय बाबींचे नियंत्रण संदर्भाधिन क्र.४ च्या शासन निर्णयान्वये मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे यांच्याकडे सोपविण्यात आले आहे. आता, सदर कार्यालयाच्या तांत्रिक बाबींचे सर्वंकष नियंत्रण मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे यांच्याकडे वर्ग करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर विभाग हा मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे या प्रादेशिक कार्यालयात थेट मुख्य अभियंता यांच्या अधिपत्याखाली कार्यान्वित राहील. खोरे समरुपण विभाग, पुणे या विभागीय कार्यालयाच्या तांत्रिक नियंत्रणात बदल केल्याने सदर विभागाच्या मंजूर आस्थापनेत व कार्यालयीन जागेत कोणताही बदल होणार नाही.

३. खोरे समरुपण विभाग, पुणे या विभागीय कार्यालयासाठी वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.टिआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि.८/३/१९८४ मधील तरतूदीनुसार मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे या प्रादेशिक कार्यालयातील नियंत्रक अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी पूर्वीप्रमाणेच सदर विभागाचे नियंत्रक अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी कायम राहतील.

४. उपरोक्त प्रमाणे नियंत्रणातील होणाऱ्या बदलाबाबतची आवश्यक ती सर्व कार्यवाही संबधित कार्यालयांनी करुन अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०४२९१५०५०२८७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUHAS BAJIRAO JADHWAR

Digitally signed by SUHAS BAJIRAO JADHWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=0de66b4d57847be117776aeaf9e53c5b70f1b8d7fdab972d3d1e2c6397e1faa5, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F66717B05E42A313D9839BD11E491F5C5F850C51D1F3CB32930D359D7331FF36, cn=SUHAS BAJIRAO JADHWAR
Date: 2025.04.29 15:05:55 +05'30'

**(सुहास जाधवर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (ज.सं.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (जलसंपदा)(गोमपाविम, मकृखोविम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (जलसंपदा)(तापाविम, कोपाविम व विपाविम ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मंत्री (खारभूमी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षा (DTHRS) मेरी, नाशिक.
९. सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
१०.सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.मुख्य अभियंता, जलविज्ञान व धरण सुरक्षितता, नाशिक.
१२.मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे.
१३.सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१४.सह सचिव (सेवा)/ सह सचिव (आस्था)/उप सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.आंतर वित्तीय सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.अधीक्षक अभियंता, आधार सामग्री पृथ:करण मंडळ, नाशिक.
१७.सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१८.कार्यकारी अभियंता, खोरे समरुपण विभाग, पुणे.
१९.कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे.
(कार्यालयाच्या नियंत्रणात होणाऱ्या बदलांची नोंद घेण्यास्तव अग्रेषित)
२०.कार्यासन आस्थापना (पुनर्रचना) संग्रहार्थ.